स्वच्छ महाराष्ट्र अभियान (ना.) २.० अंतर्गत अलिबाग नगरपरिषद जि. रायगड च्या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्वमअ-२०२५/CN११५६३८६(५)/नवि-३४**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग**
**३ रा मजला, मंत्रालय, मुंबई**
**दिनांक : ११ जून, २०२५.**

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.स्वमअ-२०२२/प्र.क्र.७७/नवि-३४ दि.१५ जुलै, २०२२.

२. राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दि. २३.०५.२०२५ रोजीच्या १७ व्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाच्या "स्वच्छ भारत अभियान (नागरी) २.०" च्या धर्तीवर राज्यामध्ये स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० ची अंमलबजावणी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सुरू करण्यात आली आहे. या अभियानांतर्गत राज्यातील सर्व शहरे कचरामुक्त करण्याचे मुख्य उद्दिष्ट असून या अंतर्गत शहरातील सर्व प्रकारच्या घनकचऱ्याचे शास्त्रोक्त व्यवस्थापन व शाश्वत स्वच्छता आणि वापरलेल्या पाण्यावर प्रक्रिया करणे समाविष्ट आहे.

२. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० अंतर्गत अलिबाग नगरपरिषदेच्या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या प्राप्त प्रस्तावास मा. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दि. २३.०५.२०२५ रोजीच्या १७ व्या बैठकीत मान्यता मिळाली आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० अंतर्गत **अलिबाग** नगरपरिषदेच्या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या प्रस्तावास राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दि. २३.०५.२०२५ रोजीच्या १७ व्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरून पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार परिच्छेद-२ मध्ये नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

## अलिबाग नगरपरिषदेच्या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाचा तपशील

| Sr. No. | Component | MoHUA Approved CSWAP | | Approved Proposal | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | Qty (TPD) | Amount (Rs.) | Qty (TPD) | Total Cost (Rs.) | Central Share (Rs.) | State Share (Rs.) | ULB Share (Rs.) | Additional Cost / (Savings) (Rs.) |
| १. | Wet Waste Plant - Compost (@ Rs. 11.5 lakh /TPD) | 5.00 | 57,50,000 | 6.00 | 33,60,417 | 16,80,209 | 15,12,188 | 1,68,021 | (23,89,583) |
| २. | Dry Waste Plant – MRF (@ Rs. 8.5 lakh /TPD) | 3.00 | 25,50,000 | 3.00 | 36,87,739 | 12,75,000 | 11,47,500 | 1,27,500 | 11,37,739 |
| ३. | Scientific Landfill (@ Rs. 6.5 lakh /TPD) | 0.77 | 5,00,000 | - | - | - | - | - | (5,00,000) |
| | Adjustment of Savings from Compost & SLF# | | | | | 5,68,870 | 5,11,983 | 56,887 | |
| | **Total** | | **88,00,000** | | **70,48,156** | **35,24,078** | **31,71,670** | **3,52,408** | **(17,51,844)** |

# Savings from Compost and SLF to be adjusted for MRF.

### २. उपरोक्त नमूद अलिबाग नगरपरिषदेच्या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाबाबत अटी व शर्ती:

२.१) सदर प्रकल्पांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था राहील.

२.२) उपरोक्त मंजूर प्रकल्पाचे काम तात्काळ ई निविदा प्रक्रिया राबवून करावे.

२.३) ई-निविदा प्रक्रिया राबविताना सर्व प्रचलित नियमांचे पालन करणे संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस बंधनकारक असेल तसेच यासाठी केंद्र शासनाकडून नमुना निविदा प्रक्रिया व कार्यपद्धती विहित करण्यात आली असेल तर त्याचा अवलंब करणे बंधनकारक राहील.

२.४) सदर प्रकल्पा अंतर्गत करण्यात येणाऱ्या खर्चामुळे आदर्श आचार संहितेचा भंग होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

२.५) सदर प्रकल्पा अंतर्गतची कामे सुरू करण्यापूर्वीच्या स्थितीचे चित्र व काम पूर्ण झाल्यानंतरची कामाची चित्रे कार्यान्वयीन यंत्रणेने अभिलेखात जपून ठेवावीत.

२.६) केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व नागरी कार्य मंत्रालय (MoHUA) व केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ (CPCB) यांनी देशातील शहरांना **घनकचरा व्यवस्थापन** प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी निर्धारित केलेल्या मार्गदर्शक तत्वाचे पालन करावे.

२.७) उपरोक्त प्रकल्पांच्या कामांचा प्रगती अहवाल दरमहा संचालनालयास सादर करावा. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित मुदतीत करण्याची जबाबदारी संबंधित मुख्याधिकारी यांची राहील.

### ३.निधी वितरण:-

३.१) सदर प्रकल्पाकरीता केंद्र, राज्य व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचा हिस्सा उपरोक्त तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे राहील. केंद्र, राज्य व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था हिस्सा वगळून अधिकची रक्कम संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या स्वनिधीतुन भरावी. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. यासाठी कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

३.२) ई-निविदा अंती खर्च प्रकल्प खर्चापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम शासनास जमा करण्यात यावी.

३.३) सदर प्रकल्पातील राज्य शासनाच्या हिश्याचा निधी केंद्र शासनामार्फत प्राप्त होणाऱ्या निधीच्या प्रमाणात उपलब्ध करून देण्यात येईल.

३.४) सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

३.५) प्रकल्पाच्या एकत्रित खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील.

३.६) सदर प्रकल्पासाठी उपलब्ध करून दिलेल्या केंद्र व राज्य शासनाच्या हिश्श्याच्या प्रथम हप्त्याच्या निधीचे विहित नमुन्यातील ७५% खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र भौतिक प्रगतीसह सादर केल्यानंतर द्वितीय हप्ता केंद्र शासनाकडून निधी उपलब्धतेनुसार वितरीत करण्यात येईल.

३.७) सदर प्रकल्पाचे काम अन्य कोणत्याही योजनेतून अथवा स्वउत्पन्नातून होत नाही यांची खातरजमा संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेने करावी. कोणत्याही परिस्थितीत कामांची द्विरुक्ती होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१११७३११९८५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
Date: 2025.06.11 17:32:04 +05'30'

**(अनिरुद्ध जेवळीकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) विभागीय आयुक्त, कोकण.
५) जिल्हाधिकारी, रायगड.
६) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय, मुंबई.
७) मुख्याधिकारी, अलिबाग नगरपरिषद जि. रायगड .
८) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
९) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
१०) उप सचिव (नवि-३४/ नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती, नवि-३४.